अव्वल कारकून संवर्गातील पदे मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून व मंडळ अधिकारी संवर्गातील पदे अव्वल कारकून संवर्गातून अदलाबदलीने भरण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र.८८/ई-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. २९.१०.२०२०

वाचा : १. शासन निर्णय क्र.एस-१०९५/प्र.क्र.३८६/ई-७, दि.२१.११.१९९५
२. शासन निर्णय क्र.संकिर्ण-१००२/प्र.क्र.६६ (भाग-२)/ई-८, दि.२०.३.२००६

प्रस्तावना:

नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीकरीता मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांना कार्यालयिन कामाचा तर अव्वल कारकुन संवर्गातील कर्मचाऱ्यांना क्षेत्रिय कामकाजाचा अनुभव येण्याच्या उद्देशाने या विभागाच्या शासन निर्णय क्र.एस-१०९५/प्र.क्र.३८६/ई-७, दि.२१.११.१९९५ अन्वये अव्वल कारकून संवर्गातील पदे मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून व मंडळ अधिकारी संवर्गातील पदे अव्वल कारकून सवर्गातील कर्मचाऱ्यांमधून अदलाबदलीने भरण्याची योजना सुरु करण्यात आली असून अशा बदल्यांचा कालावधी साधारणपणे दोन वर्षांपेक्षा अधिक असू नये व ही योजना मंडळ अधिकारी संवर्गातील पदांबाबत व कर्मचारीवृंद रचनेबात अंतिम निर्णय होईपर्यंत चालु राहील, असे शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आलेले आहे. शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्र.संकिर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.३.२००६ अन्वये महसुल विभागातील पदांचा आढावा घेवून क्षेत्रीय कार्यालयांकरीता नवीन आकृतीबंद अंमलात आला असला तरी क्षेत्रीय स्तरावर अद्याप दि.२१.११.१९९५ च्या शासन निर्णयाची अंमलबजावणी सुरु आहे.

दरम्यानच्या कालावधीत महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियम आधिनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ दि.२५.५.२००६ नूसार शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचा कालावधी तिन वर्ष इतका निश्चित करण्यात आला असून, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचेकडील अर्ज क्र.३००/२०१७ मध्ये दि.४.४.२०१८ च्या आदेशाव्दारे मंडळ अधिकारी/अव्वल कारकुन यांच्या अदलाबदलीचा कालावधी तीन वर्षाकरीता ठेवण्याचे आदेशित करण्यात आलेले आहे.

याच अनुषंगाने नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीकरीता मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांना कार्यालयिन कामाचा तर अव्वल कारकुन संवर्गातील कर्मचाऱ्यांना क्षेत्रिय कामकाजाचा अनुभव येण्याच्या उद्देशाने सुरु करण्यात आलेली अव्वल कारकून संवर्गातील पदे मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून व मंडळ अधिकारी संवर्गातील पदे अव्वल कारकून सवर्गातील कर्मचाऱ्यांमधून अदलाबदलीने भरण्याची दि.२१.११.१९९५ च्या शासन निर्णयानूसार सुरु करण्यात आलेली योजना पुढेही चालु ठेवण्याची तसेच या योजनेंतर्गत बदल्यांचा कालावधी महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियम आधिनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ दि.२५.५.२००६ नूसार व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,

औरंगाबाद यांनी मूळ अर्ज क्र.३००/२०१७ मध्ये दि.४.४.२०१८ रोजी दिलेल्या आदेशांनूसार सुधारीत करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीकरीता मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांना कार्यालयिन कामाचा तर अव्वल कारकुन संवर्गातील कर्मचाऱ्यांना क्षेत्रिय कामकाजाचा अनुभव येण्याच्या उद्देशाने सुरु करण्यात आलेली अव्वल कारकून संवर्गातील पदे मंडळ अधिकारी संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून व मंडळ अधिकारी संवर्गातील पदे अव्वल कारकून सवंर्गातील कर्मचाऱ्यांमधून अदलाबदलीने भरण्याची दि.२१.११.१९९५ च्या शासन निर्णयानूसार सुरु करण्यात आलेली योजना पुढेही चालु ठेवण्यात येत आहे. तसेच मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी मूळ अर्ज क्र.३००/२०१७ मध्ये दि.४.४.२०१८ रोजी दिलेल्या आदेशांनूसार सदर बदल्या करताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियम आधिनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ दि.२५.५.२००६ मधील तरतुदींचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२९१४३९४१७३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

SANTOSH HARIDASRAO BHOGLE

Digitally signed by SANTOSH HARIDASRAO BHOGLE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=SANTOSH HARIDASRAO BHOGLE
Date: 2020.10.29 14:44:09 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री, महसुल/मा.राज्यमंत्री, महसुल/मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागनूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. उपसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), नवीन प्रशासन भवन, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. निवडनस्ती.